फेरोसिमेंट तंत्रज्ञानाविषयी फेरोसिमेंट बांधकाम, फेरोसिमेंट दर विश्लेषण, फेरोसिमेंट बांधकामातील पध्दती इ. बाबत हस्तपुस्तिका तयार करण्यासाठी स्थापन करावयाची समिती..

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मंसस १११४/( प्र.क्र.३६५/२०१४) मोप्र-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ०३ /०१/२०१५

**प्रस्तावना :-**

विविध प्रकारच्या इमारती, धरणे, रस्ते व महामार्ग इ. चे बांधकाम करताना कुशल कारागीर, अद्यावत बांधकाम साहित्य व योग्य गुण नियंत्रण यांची आवश्यकता असते. परंतु प्रत्येक ठिकाणी या सर्वांची उपलब्धता होणे शक्य नसते. फेरोसिमेंट तंत्रज्ञान वापरल्यास उपरोक्त बाबींची आवश्यकता अल्प प्रमाणात असते. फेरोसिमेंट तंत्रज्ञान शिकण्यास साधे व सोपे असून हे स्थापत्य अभियंत्यांसाठी एक पूरक तंत्रज्ञान आहे. त्यामुळे बांधकाम अधिक मजबूत होवून खर्चही वाचवता येवू शकतो. फेरोसिमेंट तंत्रज्ञानाबाबत शासकीय सेवेतील अभियंत्यांना मार्गदर्शक ठरेल अशी सार्वजनिक बांधकाम हस्तपुस्तिका (P.W. Handbook) तयार करुन प्रसारीत केल्यास या तंत्रज्ञानाचा वापर सर्व क्षेत्रात सुरु होईल. या हस्तपुस्तिकेतील तंत्रज्ञान, बांधकाम, त्यातील घटक, दर विश्लेषण बांधकामाच्या पध्दती व त्या तंत्रज्ञानाच्या वापराबाबत सर्वंकष मार्गदर्शन मिळू शकेल, या पार्श्वभुमीवर अभियंत्यांचा अभ्यासगट/ समिती स्थापन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

फेरोसिमेंट तंत्रज्ञान, फेरोसिमेंट बांधकाम व दर विश्लेषण, फेरोसिमेंट बांधकामातील पध्दती इत्यादी बाबत महाराष्ट्र शासन सेवेतील अभियंत्यांना मार्गदर्शक ठरेल अशी सार्वजनिक बांधकाम हस्तपुस्तिका (P.W. Handbook) तयार करण्यासाठी खालील अधिकाऱ्यांची अभ्यासगट/ समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | विवरण | अधिकाऱ्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|---|
| १ | अध्यक्ष | श्री. र. वा. निकुम | मुख्य अभियंता, संकल्पन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक |
| २ | सदस्य | श्री. सखाराम तामसेकर | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वि.प्र., मुंबई |
| ३ | सदस्य | श्री. राजेंद्र पवार | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, वि.प्र., अमरावती |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | सदस्य | श्री. म. शं. बेंद्रे | अधीक्षक अभियंता (दगडी धरण) मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना, नाशिक |
| ५ | सदस्य | श्री. चंद्रमोहन हंगेकर | अधीक्षक अभियंता नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे |
| ६ | सदस्य | श्री. ग. भा. नन्नोर | कार्यकारी अभियंता पाटबंधारे संशोधन विभाग, नाशिक |
| ७ | सदस्य | डॉ. बाळकृष्ण दिवेकर | खाजगी सल्लागार ( फेरोसिमेंट मधील तज्ञ) |
| ८ | पदसिध्द सदस्य सचिव | श्री. सु. ब. चव्हाण | वैज्ञानिक संशोधन अधिकारी, सामग्री चाचणी विभाग, मेरी, नाशिक |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०३१५१८४३८२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Eknath Upasani

Digitally signed by Ravindra Eknath Upasani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ravindra Eknath Upasani
Date: 2015.01.03 15:28:24 +05'30'

( र. ए. उपासनी )
शासनाचे उपसचिव

**प्रत,**

१. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. स्वीय सहायक, प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
५. सर्व कार्यकारी संचालक/ मुख्य अभियंता/ अधीक्षक अभियंता
६. स्वीय सहायक, सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. श्री. र. वा. निकुम, अध्यक्ष, मुख्य अभियंता, संकल्पन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
८. श्री. सखाराम तामसेकर, सदस्य, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, (वि.प्र.), मुंबई
९. श्री. राजेंद्र पवार, सदस्य, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, वि.प्र., अमरावती

१०.श्री. म. शं. बेंद्रे, सदस्य, अधीक्षक अभियंता (दगडी धरण), मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना, नाशिक

११.श्री. चंद्रमोहन हंगेकर, सदस्य, अधीक्षक अभियंता, नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे

१२.श्री. ग. भा. नन्नोर, सदस्य, कार्यकारी अभियंता, पाटबंधारे संशोधन विभाग, नाशिक

१३.डॉ.बाळकृष्ण दिवेकर, सदस्य, खाजगी सल्लागार (फेरोसिमेंट तज्ञ)

१४.श्री. सु. ब. चव्हाण, पदसिध्द सदस्य सचिव, वैज्ञानिक संशोधन अधिकारी, सामग्री चाचणी विभाग, मेरी, नाशिक

१५.स्वीय सहायक, सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६.सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य, यांत्रिकी व जलविद्युत ) जलसंपदा विभाग.

१७.सर्व कार्यकारी अभियंता (स्थापत्य, यांत्रिकी व जलविद्युत) जलसंपदा विभाग.

१८.जलसंपदा विभागातील सर्व तांत्रिक अधिकारी व तांत्रिक कार्यासने.

प्रत:- मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.